श्रीमती कुसुमबाई खरात व इतर ७ यांनी मा. कामगार न्यायालय जालना येथे आयडीओ क्रमांक १२/२०१८ते १९/२०१८ व मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रि.पि.क्र.१४४३ / २०२२, ४२५५ / २०२२, १४४० / २०२२, १३१४ / २०२२, २०१४ / २०२२, २०२२ / २०२२, २०२१ / २०२२, २०१९ / २०२२ च्या अनुषंगाने दिनांक ०६/०६/२०२२ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार रोजंदारी मजूरांना फरकाची रक्कम व त्यावरील व्याज आणि अर्जाचा खर्च अशी एकूण रू. ७,०८,०२८/- अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०२३/प्र.क्र.१५/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०१ जून, २०२३.

वाचा:-

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. आयडीए-१२१०/प्र.क्र.३९३/आस्था-३/१३५००, दि.१९/०४/२०२३
२) मा कामगार न्यायालय जालना यांचा दिनांक २५/०४/२०१९ चा न्यायनिर्णय.
३) मा उच्च न्यायालय खंडपिठ औरंगाबाद येथे दाखल रि.पि.क्र. १४४३/२०२२, ४२५५/२०२२, १४४०/२०२२, १३१४/२०२२, २०१४/२०२२, २०२२/२०२२, २०२१/२०२२, आणि २०१९/२०२२,बाबत दिलेला दिनांक ०६/०९/२०२२ चा न्याय निर्णय.

प्रस्तावना:-

श्रीमती कुसुमबाई खरात व इतर ७ यांनी मा. कामगार न्यायालय जालना येथे आयडीअे क्रमांक १२/२०१८ते १९/२०१८ दाखल केले होते. दि.२५/४/२०१९ रोजीच्या न्यायालयीन आदेशान्वये प्रकरणातील मजूरांच्या/ तक्रारदरांच्या नावासमोर दर्शविलेली, कायम कामगारांच्या वेतनाच्या १/२६ दराने थकीत मजुरीच्या फरकाची रक्कम द.सा.द.शे.१० टक्के दराने तक्रार दाखल केल्याच्या दिनांका पासून प्रत्यक्ष रक्कम अदा करणे व प्रतिवादी १ ते ५ यांनी अर्जदारास या अर्जाचा खर्च म्हणून रु. ५०००/- द्यावेत असे आदेशित केले आहे.

२. सदर प्रकरणी दि. २५/४/२०१९ रोजीच्या कामगार न्यायालयाच्या निकालाच्या विरुध्द ॲड सुरेश देशमुख, सरकारी वकील, जालना यांनी व मा. विधी व न्याय विभाग औरंगाबाद यांनी त्यांच्या दि. २७/०७/२०२१ चे पत्रन्वये मा.उच्च न्यायालय औरंगाबाद येथे रिट पिटिशन दाखल करावे असे अभिप्राय दिले आहेत. त्याप्रमाणे शासनाच्या वतीने मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे रि.पि.क्र. १४४३/२०२२, ४२५५/२०२२, १४४०/२०२२, १३१४/२०२२, २०१४/२०२२, २०२२/२०२२, २०२१/२०२२, २०१९/२०२२ अपिल दाखल करण्यात आले होते. मा. उच्च न्यायालय औरंगाबाद यांनी दिनांक ०६/०६/२०२२ रोजीच्या सुनावणीवेळी मा. कामगार न्यायालय, जालना यांनी दिनांक २५/०४/२०१९ रोजी दिलेला न्यायनिर्णय कायम ठेऊन प्रस्तुतच्या रिट याचिका खारीज केल्या. त्यानुषंगाने श्री. व्ही. एस. चौधरी, सहाय्यक सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, औरंगाबाद यांनी दिनांक ०६/०९/२०२२ रोजीचे पत्रान्वये सदर प्रकरणी पुनर्विलोकन याचिका दाखल करणे, किंवा मा.

सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे स्पेशल लिव्ह पिटिशन दाखल करणे योग्य नसल्याचे कायदेशीर अभिप्राय दिले आहेत.

३. या प्रकरणी मा. उच्च न्यायालय औरंगाबाद यांच्या दिनांक ०६/०६/२०२२ चे न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करावयाची झाल्यास, प्रकरणातील मजुरांना १/२६ दराने द्यावयाची फरकाची रक्कम व त्यावरील माहे मार्च २०२३ अखेर व्याजाच्या गणनेसह (दिनांक २५.०४.२०१९ अखेर फरकाची रक्कम रु.४,८५.८४१/- + न्यायालयीन दावा खर्च रु.४०,००० + जुलै २०१९ ते ऑक्टोबर २०२२ या कालावधीचे १०% दराने व्याज दि. ३१/०३/२०२३ पर्यंत १,५२,२८७/- अशी एकूण ७,०८,०२८/-) मागणी केलेली एकूण ७,०८,०२८/- (अक्षरी सात लाख आठ हजार अठ्ठावीस फक्त) इतके अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्रीमती कुसुमबाई खरात व इतर ७ रोजंदारी मजूर यांनी मा. कामगार न्यायालय, जालना येथे दाखल केलेल्या आयडिए क्रमांक १२/२०१८ ते १९ /२०१८ मध्ये मा. कमागार न्यायालयाने दिलेल्या दिनांक २५/४/२०१९ च्या न्यायनिर्णया विरूध्द शासनाच्यावतीने मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे रि.पि.क्र. १४४३/२०२२, ४२५५/२०२२, १४४०/२०२२, १३१४/२०२२, २०१४/२०२२, २०२२/२०२२, २०२१/२०२२, २०१९/२०२२ अपिल दाखल करण्यात आले होते. त्यामध्ये दिनांक ०६/०६/२०२२ रोजी अंतिम सामाईक आदेश होऊन मा.उच्च न्यायालयाने मा.कामगार न्यायालयाचा दिनांक २५/४/२०१९ रोजीच्या निर्णयानुसार रोजंदारी मजूरांना कायम मजुरांच्या वेतनाच्या १/२६ दराने थकीत मजुरीच्या फरकाची रकम व न्यायलयीन दावा खर्च देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मजूरांना १/२६ दराने द्यावयाची फरकाची रक्कम.४,८५,८४१/- + न्यायालयीन दावा खर्च रु.४०,००० + जुलै २०१९ ते ऑक्टोबर २०२२ या कालावधीचे १०% दराने व्याज दि. ३१/०३/२०२३ पर्यंत १,५२,२८७/- अशी एकूण ७,०८,०२८/- (अक्षरी सात लाख आठ हजार अठ्ठावीस फक्त) परिशिष्ट- “अ” प्रमाणे अदा करावयाची रक्कम सन २०२३-२४ मध्ये लेखाशीर्ष २४०१ १७२२ मधील (०२) मजुरी या बाबीखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीतून अदा व वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. रोजंदारी मजूरांना अदा करावयाच्या वेतन फरकाच्या व व्याजाच्या रक्कमेची परिगणना अचूक आल्याची खात्री करावी.

४. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला,उप विभाग-दोन अनु.क्र.७ नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पुर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. आयुक्त ( कृषि ) कार्यालयाने मा. न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार देय ठरणारी रक्कम शासनाचे प्रचलित नियम,अटी व शर्ती व आदेशांचे अनुपालन करुन वितरीत करण्यात यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

६. यावरील येणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खालील लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीतून करण्यात यावा. रोजंदारी मजुरांना अदा करावयाची रक्कम रु.७,०८,०२८/- मागणी क्र. डी-३, २४०१-पीक संवर्धन (०३) रोपमळे (०३) (०१) भाजीपाला रोपमळे

फळरोपमळे व स्थानिक उद्याने, मुख्यलेखाशिर्ष २४०१ १७२२ अंतर्गत (०२) मजुरी या बाबी खाली करण्यात यावा.

तसेच सदर रक्कम कोषागारातून आहरित व वितरीत करण्यासाठी उपविभागीय कृषि अधिकारी, परतूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३५/२३/व्यय-१, दिनांक ०९/०५/२०२३ रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०११३०९५१३५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.06.02 11:53:28 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत अग्रेषित:-**

१) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर.
४) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
५) सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन, ५ वा माळा,मुंबई-३२.
६) विभागीय कृषि सह संचालक ,औरंगाबाद.
७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी जालना
८) उप विभागीय, कृषि अधिकारी परतूर,
९) जिल्हा कोषगार अधिकारी, औरंगाबाद
१०) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.

# परिशिष्ट-अ

**(नस्ती क्र.न्यायप्र- २०२३/प्र.क्र.१५/२०२१/१३-अे, दि. ०१ जून, २०२३)**

**रोजंदारी मजुरांना अदा करावयाच्या रक्कमेचा तपशील खालील प्रमाणे**

| अ.क्र. | मजूरांचे नांव व वर्ष | आयडीए क्र. | रक्कम (रूपये) |
|---|---|---|---|
| १. | श्रीम.कसुमबाई साहेबराव खरात सन १९९७ | १२/२०१८ | २०,४४७/- |
| २. | श्री.भगवान नवसाजी गवळी-सन १९९५ | १३/२०१८ | ७८,५९२/- |
| ३. | श्रीम. शकुतला नारायण कुटे -सन १९८८, | १४/२०१८ | ७८,६७६/- |
| ४. | श्रीम. यमुनाबाई पांडुरंग गाढवे-सन १९९१, | १५/२०१८ | ६९,९६३/- |
| ५. | श्रीम. कोंडाबाई संपत गाढवे-सन १९९५, | १६/२०१८ | ३६,२२८/- |
| ६. | श्री. शिवाजी गंगाधर बारसे-सन १९९४ | १७/२०१८ | ८५,११०/- |
| ७. | श्रीम. गकुळाबाई उमाजी करधने-(मयत) -सन १९९३, | १८/२०१८ | ७२,३९८/- |
| ८. | श्री.विष्णु बाबासाहेब गायकवाड-सन १९९७ | १९/२०१८ | ४४,४४७/- |
| | | **एकूण** | **४,८५,४६१** |